आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः माविम-२०१४/प्र.क्र.२७/का-१०

नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २४ सप्टेंबर, २०१५.

वाचा :- **शासन निर्णय क्र.माविम-२००२/प्र.क्र.१०६/का.१०, दि.५ फेब्रुवारी, २००७.**

प्रस्तावना :-

महिला आर्थिक विकास महामंडळ, आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) च्या अर्थसहाय्याने तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविते. हा कार्यक्रम सन २००७ ते सप्टेंबर, २०१५ या कालावधीमध्ये राबविण्यात येत आहे. सदर योजनेसाठी आयफॅडकडून मंजूर झालेले एकूण आर्थिक सहाय्य SDR १८.६० Million असून यांची त्यावेळी सुरुवातीस (सन २००७ मध्ये) रुपयाच्या दरात एकूण किंमत ₹ ११५.०० कोटी होती. त्यामुळे रुपयामध्ये मुल्यांकनाच्या किंमतीनुसार ₹ ११५.०० कोटी निश्चीत करून सदर योजना राबविण्यासाठी रू. ११५.०० कोटी कर्जरूपाने उपलब्ध करून देण्याबाबतचा संदर्भाधिन शासन निर्णय दि. ५.२.२००७ रोजी निर्गमित करण्यात आला होता.

२. तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रमासाठी आयफॅडकडून प्राप्त होणाऱ्या (SDR १८.६० Million) ₹ ११५.०० कोटी इतक्या कर्ज निधीमध्ये रुपयाच्या मुल्यांकनामुळे वाढ झाल्याने तो ₹ ११५.०० कोटी ऐवजी ₹ १७३.०० कोटी इतके झाल्याने म्हणजे ₹ ५८.०० कोटी अतिरिक्त कर्जनिधी उपलब्ध होणार आहे. त्याच्या विनियोगासाठी या योजनेस आणखी २ वर्षे मुदतवाढ व रुपयाच्या मुल्यांकन रुपांतरामध्ये वाढ झाल्याने (विनिमय दरामध्ये होणाऱ्या बदलामुळे) प्राप्त होणाऱ्या अतिरिक्त कर्जास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला

सक्षमीकरण कार्यक्रमासाठी आयफॅडकडून प्राप्त होणाऱ्या कर्जामध्ये वाढ करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रमाची सुरुवात जुलै, २००७ पासून झाली असून सप्टेंबर, २०१५ मध्ये सदर कार्यक्रम संपुष्टात येणार आहे. सदर कार्यक्रमास २ वर्षे मुदतवाढ देण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधीच्या अर्थसहाय्याने तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रमासाठी दि.५ फेब्रुवारी, २००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयफॅडकडून मंजूर झालेले आर्थिक सहाय्य SDR १८.६० Million यांची त्यावेळी (सन २००७) रुपयामध्ये मुल्यांकनाची किंमतीनुसार ₹ ११५.०० कोटी निश्चित करण्यात आले होते.

२. तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रमासाठी आयफॅडकडून २ वर्षे मुदतवाढ देण्याबाबतची कार्यवाही केंद्र शासनामार्फत सुरु आहे. त्यामुळे आयफॅडकडून मंजूर झालेले आर्थिक सहाय्य SDR १८.६० Million च्या रुपयाच्या मुल्यांकन रुपांतरामध्ये वाढ झाल्यामुळे सदर SDR १८.६० Million ची किंमत ₹ १७३.०० कोटी झाल्याची नोंद घेऊन त्याआधारे तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रमासाठी आयफॅडकडून प्राप्त होणाऱ्या कर्जासाठी पूर्वी मंजूर असलेल्या ₹ ११५.०० कोटी मध्ये ₹ ५८.०० कोटीची वाढ करुन एकूण ₹ १७३.०० कोटी इतका निधी कर्जरुपाने उपलब्ध करुन देण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रथम:त महालेखापाल (लेखापरीक्षा) मुंबई यांना कळवून तेजस्विनी ग्रामीण महिला सक्षमीकरण योजनेचे विशेष लेखापरीक्षण करून घेणे आवश्यक राहील.

२. रू. १७३.०० कोटीपेक्षा अधिकचे कर्ज यापुढे मंजूर करण्यात येणार नाही.

३. सदर मान्यतेनुसार सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी आवश्यक तरतूद पुरवणी मागणीद्वरे उपलब्ध करून घ्यावी. व यापुढील आर्थिक वर्षात दरवर्षी आवश्यकतेनुसार अर्थसंकल्पामध्ये तरतूद

करण्यात यावी. सदर योजनेचा पुढील कालावधी संपताच या शासन निर्णयाच्या अंमलबजावणीचा कालावधी आपोआप संपुष्टात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ५४८/१५ /व्यय सहा, दि. ५.९.२०१५ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०९२४१४३८३०८६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Ramchandra Divekar

Digitally signed by Manohar Ramchandra Divekar
DN: CN = Manohar Ramchandra Divekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Reason: I am the author of this document
Date: 2015.09.24 15:06:43 +05'30'

**म.रा.दिवेकर**
**कार्यासन अधिकारी**

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
३. महालेखापाल १/२ ( लेखा परीक्षा )/(लेखा व अनुज्ञेयता(, मुंबईनागपूर/,
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. वित्त विभाग (का-व्यय.६/ सा(.उ., मंत्रालय, मुंबई,
८. नियोजन विभाग (का.१४१५), मंत्रालय, मुंबई,
९. कार्यासन-०४, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती (का.१०)